पैठण पंचायत समिती (जिल्हा औरंगाबाद)
प्रशासकीय इमारतीच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.....

महाराष्ट्र शासन.
ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
शासन निर्णय क्र.पंसई २००८/प्र.क्र.२८७/ पंरा-७,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक : १५ जुलै,२००९

संदर्भ :- मुख्य कार्यकारी अधिकारी,जि.प.,औरंगाबाद यांचे पत्र क्र.जिपऔ/पीबीआर-४/०८-०९,दि.२४.३.०९

प्रस्तावना :-

मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांनी संदर्भीय दिनांक २४.३.२००९ च्या पत्रान्वये पैठण पंचायत समितीची प्रशासकीय इमारत अतिशय जुनी झालेली असून मोडकळीला आलेली असल्याने तसेच कर्मचाऱ्यांना बसण्यास जागा अपूरी पडत असल्याने, जुनी पंचायत समितीची इमारत पाडून त्या ठिकाणी नविन प्रशासकीय इमारत बांधण्याच्या प्रस्तावास मान्यता मिळण्याची विनंती केली आहे.

२. पैठण पंचायत समितीची अस्तित्वात असलेल्या इमारतीचे बांधकाम सन १९६५ मधील अस्तित्वातील इमारतीचे बांधकाम मोडकळीस आलेले आहे. तालुका पंचायत समिती स्तरावरील जिल्हा परिषदेचे विविध विभागाची कार्यालये इतरत्र विखुरलेली आहेत. या सर्व बाबी विचारात घेवून, सर्व कार्यालये एकाच ठिकाणी बांधण्याच्या दृष्टीने मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद, औरंगाबाद यांनी न.भू.क्र.१६४० येथील पैठण पंचायत समितीच्या मालकीच्या भूखंडावर नविन इमारत बांधकामाचा प्रस्ताव सादर केला आहे. या करीता मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सा.बां.मुंबई यांच्या कडील टाईप प्लॅन T-ADB/५५११ हा नमुना नकाशा वापरण्यात आला असून, पंचायत समितीच्या इमारती करीता एकूण १०२६ चौ.मी. क्षेत्रफळाचे बांधकाम प्रस्तावित करण्यात आले आहे. सदर बांधकामा करीता एकूण रु.२८७.२६ लक्ष किंमतीचे ढोबळ अंदाजपत्रक सादर करण्यात आले आहे. सदरील अंदाजपत्रक सा.बां.विभागाच्या सन २००७-०८ च्या दरसूचीवर आधारीत आहे. मुख्य कार्यकारी अधिकारी, जि.प.,औरंगाबाद यांनी प्रस्तावासोबत अस्तित्वातील कार्यालयीन इमारत मोडकळीला आल्याबाबतचे प्रमाणपत्र, अस्तित्वातील इमारतीचे फोटो, जागा मालकीचे कागदपत्र, जागेचा नकाशा, पंचायत समिती व जिल्हा परिषदेच्या सर्वसाधारण सभेच्या ठरावाच्या प्रती सादर केलेल्या आहेत

३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद यांनी सादर केलेल्या प्रस्तावाची मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) यांनी केलेल्या तांत्रिक छाननी अंती, पैठण पंचायत समितीच्या रु.१,४४,४७,०००/- इतक्या अंदाजपत्रकीय किंमतीच्या बांधकामास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

-: शासन निर्णय :-

पैठण (जिल्हा-औरंगाबाद ) पंचायत समितीची जूनी प्रशासकीय इमारत पाडून, त्या जागी नवीन प्रशासकीय इमारतीच्या एकूण रक्कम रुपये- १,४४,४७,०००/- (रुपये एक कोटी चव्वेचाळीस लक्ष सत्तेचाळीस हजार फक्त) इतक्या अंदापत्रकीय किंमतीच्या बांधकामास पुढील अटींच्या अधिन राहून, या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

(१) नियोजित पैठण पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारतीचे बांधकामाकरीता मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, सा.बां.वि. मुंबई यांच्या नमुना नकाशामध्ये शासन मान्यते शिवाय कोणताही फेरबदल करण्यात येवू नये.
(२) प्रस्तुतचे काम हाती घेतल्यापासून जास्तीत जास्त दोन वर्षात पूर्ण होईल, असे संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी नियोजन करावे.

कृ.मा.प. . . . .

(३) या प्रकरणी सुधारीत प्रशासकीय मान्यता दिली जाणार नसल्याने, मंजूर प्रमा किंमतीतच काम पूर्ण करण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.), जि.प. यांनी दक्षता घ्यावी. प्रमा किंमतीपेक्षा अधिक खर्च झाल्यास तो पंचायत समिती/ जिल्हा परिषदेने सोसावा.

(४) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीमध्ये अपंगांना सोयी-सुविधा उपलब्ध होण्याच्या दृष्टीने रॅम्प, रेलींग व तत्सम सुविधा उपलब्ध करुन देणे बंधनकारक राहील.

(५) प्रस्तुत प्रशासकीय इमारतीच्या बांधकामाचा त्रैमासिक प्रगती अहवाल वेळीच शासनास पाठविण्याची संबधित कार्यकारी अभियंता (बांध.) जि.प. यांनी दक्षता घ्यावी.

४. पैठण पंचायत समितीच्या प्रशासकीय इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकाचा सर्वसाधारण गोषवारा पुढीलप्रमाणे आहे:-

**GENERAL ABSTRACT**

| Sr. | Work Details | Amount (in Rs) |
|---|---|---|
| 1 | Cost of.Building | 10265000.00 |
| 2 | Add 8% external water supply and sanitary arrangement | 821200.00 |
| 3 | Add 11% internal Electrification. | 1129150.00 |
| 4 | Add 4% Contingencies | 410600.00 |
| 5 | Add 2% for computerization | 205300.00 |
| 6 | Add L/S provision for fire fighting arrangement | 500000.00 |
| 7 | Add L/S provision for top rain water harvesting | 500000.00 |
| 8 | Add 6% for increase in DSR Rate (Price Escalation) | 615900.00 |
| | Total Estimated cost Rs. | 14447150.00 |
| | Say | Rs.1,44,47,000/- |

५. उपरोक्त बांधकामासाठी संबधित सक्षम प्राधिकाऱ्याची तांत्रिक मान्यता प्राप्त झाल्यानंतर अनुदान स्वरुपात निधी उपलब्ध करुन दिला जाणार असून, तो उपलब्धतेनुसार अर्थसंकल्प वितरण प्रणाली (BDS) द्वारे वितरीत करण्यांत येईल.

६. यावरील खर्च "२५१५-इतर ग्रामीण विकास कार्यक्रम १०१, पंचायती राज ३१ सहाय्यक अनुदाने (०१) (०३) जिल्हा परिषदांच्या इमारती बांधकामासाठी जिल्हा परिषदांना सहाय्यक अनुदाने (२५१५००५३)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

७. सदर प्रस्तावाची तांत्रिक छाननी मुख्य अभियंता (प्रमंग्रासयो) यांच्यामार्फत करण्यात आली आहे.

८. प्रस्तुतचा शासन निर्णय, वित्तीय अधिकार, नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग-पांच, अ.क्र.१ महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परि.क्र.१३४ खाली प्रशासनिक विभागास प्रदान करण्यांत आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यांत येत आहे.

९. प्रस्तुतचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र.२००९०७१५११२५२७००१ असाआहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( चंद्रकांत ह. वडे )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) विभागीय आयुक्त औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
२) महालेखापाल, महाराष्ट्र -१ मुंबई / महाराष्ट्र -२, नागपूर.
३) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद औरंगाबाद
४) मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद औरंगाबाद
५) कार्यकारी अभियंता (बांधकाम), जिल्हा परिषद औरंगाबाद
६) जिल्हा कोषागार अधिकारी, जिल्हा औरंगाबाद
७) मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुबंई.
८) उपमुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा औरंगाबाद विभाग, औरंगाबाद
९) जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, औरंगाबाद
१०) सभापती, पंचायत समिती, सिन्नर, जिल्हा औरंगाबाद
११) गट विकास अधिकारी, पंचायत समिती, पैठण, जिल्हा औरंगाबाद
१२) वित्त विभाग, (व्यय १५ / अर्थ.१६), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१२) नियोजन विभाग (का.क्र.१४११/१४७४) मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३) सार्वजनिक बांधकाम विभाग,इमारती-३, मंत्रालय मुंबई ४०० ०३२
१४)का.क्र, वित्त-१ व योजना-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
१५) निवड नस्ती,कार्यासन क्र.पं.रा.७,ग्राम विकास व जलसंधारण विभाग,मंत्रालय, मुंबई